**महाराष्ट्र राज्य लॉटरी**

महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडतीची बक्षिस रचना व कार्यपध्दती.

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मरालॉ- २०१५/ प्र.क्र.२८-ब/ लॉटरी-२**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.

तारीख : २६ ऑगस्ट,२०१५

**वाचा :** शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०१२/प्र.क्र.४७/ लॉटरी -२, दिनांक ०८/०५/२०१२.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्याच्या विविध लॉटरींच्या सोडती केंद्र शासनाच्या लॉटरी नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित केल्या जातात. शासनाने महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडत दिनांक २९/०९/२०१५ रोजी सायंकाळी ४.०० वाजता काढण्याचा निर्णय या शासन निर्णयान्वये घेतला आहे.

२. **महाराष्ट्र गणपती भव्यतम** या सोडतीच्या तिकीटांचे मूल्य रू. १००/- असून पहिले सामायिक बक्षिस (पूर्ण क्रमांक) रू. १ कोटी ११ लाख सर्व मालिकांमधून एक ठेवले असून या साठी विक्रेत्यास १लाख ११ हजार रूपये इतका बोनस ठेवण्यात आला आहे. पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित चार मालिकांसाठी पहिल्या बक्षिसाचा क्रमांक रू.१,००,०००/- च्या प्रोत्साहनपर बक्षिसास पात्र राहतील. या सोडतीत एकूण ५ मालिका असून प्रत्येक मालिकेत ८० हजार तिकीटे या प्रमाणे एकूण ४ लाख तिकीटे मुद्रीत करण्यात येणार आहेत. प्रत्येक मालिकेतील तिकीटांचे क्रमांक ००००० ते ७९९९९ या प्रमाणे देण्यात आलेले आहेत. **महाराष्ट्र गणपती भव्यतम** सोडतीची तिकीटे विक्री करणाऱ्या विक्रेत्यास सर्व बक्षिसांचे प्रदान तिकीट विजेत्यास केल्याबद्दल विक्रेत्यांना २% सेवाआकार देण्यात येईल.

३. या भव्यतम सोडतीमध्ये एक **विशेष तिकीट योजना** ठेवण्यात आली असून सोडतीची कोणतीही १०० तिकीटे खरेदी करणा-या ग्राहकास एक विशेष तिकीट मोफत देण्यात येईल. या तिकीटांची संख्या **चार हजार** इतकी असून त्यांचे क्रमांक **०००० ते ३,९९९** असे असतील. या विशेष सोडतीमध्ये **रू.१० हजारचे पहिले बक्षिस व रू.१०० ची ३९९९ बक्षिसे अशी एकुण रू.४,०९,९०० ची ४००० बक्षिसे** ठेवण्यात आली आहेत.

४. महाराष्ट्र शासनाने या सोडतीची तिकीट विक्री शिवडी कार्यालयामार्फत करण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्यानुसार **महाराष्ट्र गणपती भव्यतम** या सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि. व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, क्लॅरेज हाऊस, हाजी बंदर रोड, शिवडी (पू), मुंबई-४०००१५ येथून राज्य लॉटरीच्या सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील.

५. या सोडतीची तिकीट विक्री करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या तिकीट विक्रेत्यांना या तिकीट विक्रीच्या १०० तिकीटांचे एका पुस्तकावरील (M.R.P. Rs.१००/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर खरेदी करण्यात आलेल्या या सोडतीच्या एकूण लॉटरी तिकीटांवर पुढीलप्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

| तिकीटांची संख्या | प्रस्तावित घाऊक सूट |
|---|---|
| ५०० ते ५०,००० | २०% |
| ५०,००१ ते १,००,००० | २२% |
| १,००,००१ ते १,५०,००० | २४% |
| १,५०,००१ ते२,००,००० | २८% |
| २,००,००१ च्या पुढे | ३०% |

जे अभिकर्ते सोडतीच्या एकूण २५ %पेक्षा जादा तिकिटांची खरेदी करतील त्या अभिकर्त्यांना देण्यात येणाऱ्या २% विशेष सूटीबाबतच्या अटी व शर्ती, शासन निर्णय वित्त विभाग क्र. मरालॉ २००१२/प्र.क्र.४७ /लॉटरी -२, दिनांक ०८/०५/२०१२ नुसार लागू राहतील.

६. या सोडतीच्या तिकीट छपाईचे आदेश उपसंचालक (वि.व ले.) महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू), मुंबई-१५ या कार्यालयाकडून स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. या सोडतीची तिकीट छपाई मे. साई सिक्युरिटी प्रिंटर्स प्रा. लि.,फरीदाबाद यांचेकडून करून घेण्यात येतील. या तिकीटाचे आकारमान २६ x १४ cms असून यासाठी १३० GSM Indian Art Paper वापरण्यात येऊन त्याचा दर रू.२२९/- प्रती चौ. से. प्रती एक लाख तिकीटे असा राहील. तसेच विशेष तिकीट योजनेच्या तिकीटाचे आकारमान १८ x ८ cms असून यासाठी ८० GSM Mapletho Paper वापरण्यात येऊन त्याचा दर रु. १७९ /- प्रती चौ. से. प्रती एक लाख तिकीटे असा राहील. या तिकीटांची छपाई देखील मे. साई सिक्युरिटी प्रिंटर्स प्रा. लि.,फरीदाबाद यांचेकडून करून घेण्यात येईल.

७. घाऊक अभिकर्त्याने ज्या किरकोळ अभिकर्त्यांस तिकीटे विकली असतील त्या किरकोळ अभिकर्त्यांची यादी (तिकीटांच्या क्रमांकासह) घाऊक अभिकर्त्याने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या शिवडी कार्यालयात सादर करणे बंधनकारक आहे.

८. या सोडतींची बक्षिसरचना व बक्षिसे निश्चित करण्याची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे राहील.

**महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडत**

मालिका : ५
तिकीटांचे क्रमांक ००००० ते ७९९९९
सोडत दिनांक: दि.२९/०९/२०१५,
वेळ: सायं. ४.०० वा.

प्रत्येक मालिकेत : ८०००० तिकीटे
एकूण तिकिटे : ४ लाख
तिकीटाची किंमत : रू. १००/-

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम रु. | प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम रु. | विक्रेता बोनस (प्रत्येक मालिकेत) रूपये | एकूण विक्रेता बोनस रूपये |
|---|---|---|---|---|---|---|
| पहिले (सामायिक)बक्षिस (पूर्ण क्रमांक) | १,११,००,००० | -- | १ | १,११,००,००० | १,११,००० | १,११,००० |
| प्रोत्साहनपर बक्षिस (पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित मालिकांसाठी पहिल्या बक्षिसाच्या क्रमांकासाठी) | १,००,००० | -- | ४ | ४,००,००० | -- | -- |
| दुसरे बक्षिस ( पूर्ण क्रमांक) (प्रत्येक मालिकेत ) | २,००,००० | १ | ५ | १०,००,००० | -- | -- |
| तिसरे बक्षिस (८ पूर्ण क्रमांक ) (प्रत्येक मालिकेत ) | १०,००० | ८ | ४० | ४,००,००० | -- | -- |
| चौथे बक्षिस (८ पूर्ण क्रमांक ) (प्रत्येक मालिकेत ) | ५,००० | ८ | ४० | २,००,००० | -- | -- |
| पाचवे बक्षिस (८ पूर्ण क्रमांक ) (प्रत्येक मालिकेत ) | २,००० | ८ | ४० | ८०,००० | -- | -- |
| सहावे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (१० जुळवण्या) | १००० | -- | ४०० | ४,००,००० | -- | -- |
| सातवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (१० जुळवण्या) | ५०० | -- | ४०० | २,००,००० | -- | -- |
| आठवे बक्षिस (शेवटचे ४ अंक ) (१० जुळवण्या) | २०० | -- | ४०० | ८०,००० | -- | -- |
| नववे बक्षिस (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील प्रत्येकी १० व्या क्रमांकास ) | १५० | -- | ४०,००० | ६०,००,००० | -- | -- |
| **एकूण** | -- | -- | **४१,३३०** | **१,९८,६०,०००** | **१,११,०००** | **१,११,०००** |

**९. सोडतीची कार्यपध्दती :-**

९.१ या सोडतीचे बक्षिस विजेते क्रमांक निश्चित करण्यासाठी सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ६ ड्रम ठेवले जातील. प्रत्येक मालिकेमध्ये ००००० ते ७९९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रम मध्ये मालिकांचे क्रमांक असतील. दुसऱ्या ड्रम मध्ये ० ते ७ क्रमांकाच्या चकत्या असतील व उर्वरित ४ ड्रम मध्ये ० ते ९ अंकाच्या प्रत्येकी एक चकती या प्रमाणे दहा चकत्या टाकण्यात येतील. पहिल्या ड्रममध्ये ० ते ७ व उर्वरित ५ ड्रम्समध्ये ० ते ९ अंकाची प्रत्येकी एक चकती याप्रमाणे चकत्या ठेवण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात(पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील. व तो क्रमांक विजेता म्हणून घोषित केला जाईल.

९.२ **दुसरे बक्षिस रू. २,००,०००/-** दुस-या रु. २,००,०००/- च्या बक्षिसाकरिता पूर्ण अंकाचा १ भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येतील.

९.३ **तिसरे बक्षिस रू. १०,०००/-** तिसऱ्या रु. १०,०००/- च्या बक्षिसासाठी ८ पूर्ण भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येतील.

९.४ **चौथे बक्षिस रू. ५,०००/-** चौथ्या रु. ५,०००/- च्या बक्षिसासाठी ८ पूर्ण भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येतील.

९.५ **पाचवे बक्षिस रू.** २०००/- पाचव्या रु. २०००/- च्या बक्षिसासाठी ८ पूर्ण भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येतील.

९.६ **सहावे बक्षिस रू. १०००/-** सहाव्या रु. १०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक जुळवणी अशा दहा जुळवण्या स्वतंत्र्यरित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशा सर्व मालिकेतील सर्व तिकीटे रु. १०००/- च्या सहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

९.७ **सातवे बक्षिस रू. ५००/-** सातव्या रु. ५००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक जुळवणी अशा दहा जुळवण्या स्वतंत्र्यरित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशा सर्व मालिकेतील सर्व तिकीटे रु. ५००/- च्या सातव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

९.८ **आठवे बक्षिस रू. २००/-** आठव्या रु. २००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक जुळवणी अशा दहा जुळवण्या स्वतंत्र्यरित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशा सर्व मालिकेतील सर्व तिकीटे रु. २००/- च्या आठव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

९.९ **नववे बक्षिस रू.** १५०/- नवव्या रु. १५०/- च्या बक्षिसासाठी वरील परि. ९.१ मध्ये विहित केलेल्या पद्धतीने शेवटच्या ४ ड्रममधून कोणत्याही ४ अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येकी १० व्या क्रमांकास रू.१५०/- चे नववे बक्षिस सर्व मालिकांसाठी देण्यात येईल.

९.१० **पहिले बक्षीस रू.१,११,००,०००/-** या सोडतीमध्ये ५ मालिकात मिळून रू.१,११,००,०००/- चे पहिले बक्षीस (सामायिक) (पूर्ण क्रमांक) ठेवण्यात आले आहे. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लास्टिक/ रबरी आवरणात घालून पंच मंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रम मध्ये ठेवण्यात येईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यानंतर ड्रम फिरविला जाईल व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रम मधून एकच पिशवी (पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंच मंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील त्यानंतर वरील परिच्छेद ९ मध्ये विहित करण्यात आलेल्या पध्दतीने भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

१०. **प्रोत्साहनपर बक्षिस रू.१,००,०००/- ची ४ बक्षिसे काढण्याचे कार्यपध्दती**

या प्रोत्साहनपर बक्षिसासाठी पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित ४ मालिकांकरिता पहिल्या बक्षिसासाठी निश्चित करण्यात आलेल्या भाग्यवान क्रमांकास रू.१ लाखाचे प्रोत्साहनपर बक्षिस देण्यात येईल.

११ **विशेष तिकीट योजना काढण्याची कार्यपध्दती :**

**११.१ पहिले बक्षिस रू. १०,०००/- :-** या विशेष सोडतीसाठी तिकीटांचे क्रमांक ०००० ते ३९९९ या प्रमाणे असून, या सोडतीसाठी ४ ड्रम वापरण्यात येऊन ते सोडतीच्या ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ठेवण्यात येतील. पहिल्या ड्रममध्ये ० ते ३ व उर्वरित ३ ड्रम मध्ये ० ते ९ या क्रमांकाची प्रत्येकी १ चकती या प्रमाणे १० चकत्या टाकण्यात येतील. पंच मंडळासमोर प्रत्येक चकती प्लास्टीक / रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जातील. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाहीत. पंच मंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजवील्यावर सर्व ड्रम एकाचवेळी फिरवीले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजवील्यावर सर्व ड्रम एकाचवेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रम मधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील अशा पध्दतीने पहिल्या बक्षिसाचा रू. १०,०००/- भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

**११.२ दुसरे बक्षिस रू.१००/-** :- दुसऱ्या रूपये १००/- च्या बक्षिसासाठी, पहिल्या रू.१०,०००/- बक्षिसासाठी निश्चित करण्यात आलेला भाग्यवान क्रमांक वगळून उर्वरित सर्व क्रमांकाची तिकीटे रू.१००/- च्या दुसऱ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**१२.** या सोडतीच्या तिकीट छपाईचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००) १०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२) (००) (०१) प्रमुख लॉटरी १६ प्रकाशने व बक्षिस विजेत्या तिकीटांचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००)१०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२)(००)(०१) प्रमुख लॉटरी ०५ बक्षिसे या लेखाशिर्षामधील उपलब्ध तरतूदींतून भागविण्यात यावा.

**१३.** पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत विजेत्या क्रमांकाची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वसनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

**१४.** या सोडतीमध्ये कोणत्याही मालिकेमध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

**१५.** या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

**१६.** वर नमुद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

**१७.** सदरच्या सोडतीची कार्यपध्दती पूर्ण झाल्यानंतर शासनाच्या विहित तरतूदीं / कायद्यानुसार या सोडतीच्या निकालाची प्रसिध्दी शासनाच्या राजपत्रात करण्याची कार्यवाही उपसंचालक (वि.वले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, शिवडी (पू), मुंबई-१५ या कार्यालयाकडून करण्यात येईल व याबाबतची संपूर्ण जबाबदारी त्यांची राहिल.

**१८.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२७११२१२४२६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Kundalik Avhad

Digitally signed by Madhav Kundalik Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madhav Kundalik Avhad
Date: 2015.08.27 11:27:43 +05'30'

**(माधव आव्हाड )**
कक्ष अधिकारी तथा
राज्य लॉटरी अधिकारी, वि.वि.

**प्रति,**

१.मा. मंत्री, (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२.मा. मंत्री , (गृह), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३.मा. राज्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४.अपर मुख्य सचिव, (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. अपर मुख्य सचिव, (गृह) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
७.पोलीस महासंचालक (कायदा व सुव्यवस्था) मुंबई यांचे स्वीय सहायक.
८.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.

९. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
११. उप सचिव,राज्य लॉटरी यांचे स्वीय सहायक.
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४.उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पूर्व) मुंबई १५.
१५.कक्ष अधिकारी, प्रशा-४/लॉटरी-३/ लेखाधिकारी, अर्थ संकल्प (लॉटरी संचालनालय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती, लॉटरी -२.